जलसंपदा विभागांतर्गत सिंचन व्यवस्थापनाविषयक
प्रमाणपत्र अभ्यासक्रम राबविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२१/ प्र.क्र. १६१/२१/लाक्षेवि (आस्था ),
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ०३/१२/ २०२१.

प्रस्तावना-

जलसंपदा विभागात प्रामुख्याने बांधकाम व सिंचन व्यवस्थापन अशा दोन प्रकारात कामकाज चालते. बांधकामाशी निगडीत बाबी दिवसेंदिवस कमी होत असून सिंचन व्यवस्थापनातील कामकाजात वाढ होत आहे. दरवर्षी सिंचन क्षेत्रात वाढ होत असल्याने सिंचन व्यवस्थापनावरील ताण मोठ्या प्रमाणावर वाढला आहे. या विषयी सन २००५ मध्येच यास्थितीचा विचार करुन शासनाने महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ अमंलात आणला आहे, ज्या अंतर्गत प्रकल्प लाभार्थींचा मोठ्या प्रमाणावर सिंचन व्यवस्थापनेत सहभाग घेणे अपेक्षित आहे. यास्तव विविध स्तरावरील पाणी वापर संस्थांची स्थापना करुन, शासनाव्दारे पारंपारीक पध्दतीने करण्यात येणाऱ्या पाण्याचे व्यवस्थापन व वितरण, टप्प्याटप्प्याने पूर्णपणे लाभार्थी संस्थांनी करावे असे अपेक्षित आहे. सद्यस्थितीत महाराष्ट्रात या कायद्याअंतर्गत जवळपास ५५०० संस्था स्थापन झाल्या असून त्यापैकी अत्यंत मोजक्या संस्था पूर्ण कार्यक्षमतेने सहभागी झाल्या आहेत. लोकांमध्ये जलव्यवस्थापन विषयी करावयाच्या कार्यवाहीची आवड निर्माण करुन, जनजागृती व माहिती व्दारे स्थानिक सर्वसाधारण जनता व युवा पिढी या कामात सहभागी होऊ शकेल यादृष्टीने महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा) व्दारे प्रस्तावित अभ्यासक्रम उपलब्ध करुन देण्याचे विचाराधीन आहे.

या संदर्भात शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णयः-

१) जलसंपदा विभागांतर्गत सिंचन व्यवस्थापन कामाविषयक महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी नाशिक तर्फे आखून दिलेले, खालील नमूद प्रमाणपत्र अभ्यासक्रम, इच्छूक विद्यार्थी यांनी पुर्ण करुन त्यावर आधारित परिक्षा उत्तीर्ण केल्यास ते सदर प्रमाणपत्र प्राप्त करण्यास पात्र राहतील.

| अ. क्र. | अभ्यासक्रमाचे नाव व विवरण | वर्गातील प्रशिक्षण (आठवडे) | क्षेत्रिय प्रशिक्षण (आठवडे) | किमान/आवश्यक शैक्षणिकपात्रता |
|---|---|---|---|---|
| १) | **जलवितरण व व्यवस्थापन विषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम** (CCWDM- Certificate course in water distribution and management )<br>कालवा निरिक्षक/ मोजणीदार/ दप्तरकारकून यांच्या कामाविषयक अभ्यासक्रम. | ३ | ३ | कोणत्याही शाखेची पदवी प्राप्त |
| २) | व्दारांचे परिचालना साठी **प्रमाणपत्र अभ्यासक्रम** (CCGO- Certificate course in gate operation )<br>ऑपरेटर/ इलेक्ट्रिशिअन यांच्या कामाविषयक अभ्यासक्रम | २ | २ | इलेक्ट्रिल पदविका/ इलेक्ट्रिशिअन (आय. टी. आय.)/मान्यता प्राप्त संस्थेच्या Operator / Electrician संबंधीचा कोर्स |
| ३) | उपसासिंचनयोजना व स्विचयार्ड परिचालन विषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम. (CCLIS-Certificate course in Lift irrigation schemes and Switch yard operation )<br>ऑपरेटर/ इलेक्ट्रिशिअन यांच्या उपसा सिंचन योजना कामाविषयक अभ्यासक्रम | २ | २ | इलेक्ट्रिल पदविका/ इलेक्ट्रिशिअन (आय. टी. आय.)/मान्यता प्राप्त संस्थेच्या Operator / Electrician संबंधीचा कोर्स |
| ४) | अवजड यंत्र चालक विषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम ( CCHMO- Certificate course in heavy machinery operation )<br>अवजडयंत्रचालक यांच्या कामाविषयक अभ्यासक्रम | ० | २ | शालान्त परीक्षा (एस. एस. सी./ समकक्ष परीक्षा) आणि प्रादेशिक परिवहन विभागाचे आवश्यक परवाने |
| ५) | मदतनीस (स्वच्छक) कामाविषयक अभ्यासक्रम. ( CCHS- Certificate course for helper related services) | -- | १ | शालांत प्रमाणपत्र परिक्षा उत्तीर्ण |

**२. प्रशिक्षणावर आधारीत परिक्षा:**

२.१ उपरोक्त विषयांचे अभ्यासक्रम संबंधित क्षेत्रिय स्थापत्य मंडळ कार्यालयाने / यांत्रिकी मंडळाने वर्षातून गरजेनुसार २ ते ३ वेळा करावे. खालील नमूद अभ्यासक्रम प्रकारासाठी ५० गुणांची लेखीपरिक्षा व ५० गुणांची परिक्षा प्रात्यक्षिक स्वरुपात महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी यांच्या देखरेखीखाली संबंधित मंडळामार्फत आवश्यकतेनुरुप परंतु वर्षातून किमान एकदा घेण्यात येईल.

I. जलवितरण व व्यवस्थापन विषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम

II. व्दारांचे परिचालना साठी प्रमाणपत्र अभ्यासक्रम

III. उपसा सिंचन योजना व स्विचयार्ड परिचालन विषयक प्रमाणपत्र अभ्यासक्रम .

२.२ परिच्छेद १ मध्ये अभ्यासक्रम क्र. ४ व ५ साठी फक्त प्रात्यक्षिक परिक्षा घेण्यात यावी.

२.३ सदर परिक्षेत उत्तीर्ण होण्यासाठी किमान ४५ % गुण मिळविणे आवश्यक राहील. संबंधित परिक्षा उत्तिर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना मेटा मार्फत प्रमाणपत्र देण्यात येईल.

**३. प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांची निवड व प्रशिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती:**

३.१ या प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांची निवड संबंधित मंडळ कार्यालयामार्फत/ विद्यार्थ्यांने स्वत: /पाणी वापर संस्था मार्फत/ इतर निमशासकीय/ अशासकीय संस्थांमार्फत/ कंत्राटदाराकडून/ अभिकरणांकडून नामनिर्देशनाव्दारे करावी.

३.२ प्रशिक्षण शुल्क ठरवितांना संबंधित मंडळ कार्यालयाने प्रशिक्षणावरील प्रत्यक्ष खर्च, व्याख्यात्यांचे मानधन, मेटा यांना द्यावयाचे परिक्षा शुल्क, विद्यार्थ्यांची भोजन व्यवस्था (असल्यास), विद्यार्थ्यांचे चहापान (असल्यास) वरील होणारा खर्च, इ. समाविष्ट करुन शुल्क ठरवावे. **सदर शुल्कात जाणे-येणे व अनुषंगिक खर्चाचा शुल्क समाविष्ट करण्यात येऊ नये. सदर खर्च विद्यार्थींनी स्वत: करावयाचा आहे.**

३.३ सदर प्रशिक्षण व परिक्षांवर येणाऱ्या खर्चापैकी ५०% खर्च स्वत: विद्यार्थ्यांकडून अथवा संबंधित नामांकन करणाऱ्या संस्थेकडून करण्यात यावा. उर्वरित ५०% खर्च संबंधित सिंचन मंडळांना बिगर सिंचन पाणीपट्टी वसूलीतून भागवावा. तसेच यांत्रिकी विषयक अभ्यासाक्रमांबाबत आवश्यकतेनुसार उर्वरित ५०% बाबतचे खर्च यांत्रिकी संघटनास संबंधित सिंचन मंडळांनी उपलब्ध करुन द्यावेत.

४) सदर अभ्यासक्रमा संदर्भात वर नमुद सूचनांव्यतिरीक्त खालीलप्रमाणे सूचना देखील देण्यात येत आहे.

I. सदर प्रमाणपत्र अभ्यासक्रमांतर्गत विषयसूची, अभ्यासक्रम कालावधी, विद्यार्थ्याची शैक्षणिक पात्रता व परिक्षेचे स्वरुपा बाबत काही बदल करावयाचे असल्यास, मेटा यांनी यांत्रिकी संघटना/सिंचनव्यवस्थापन मंडळांच्या सहकार्याने तसे बदल तयार करुन घ्यावे व महासंचालक, मेरी यांच्या मान्यतेने अंतिम करावे. सदर बदलाशी शासनास अवगत ठेवावे.

II. सदर प्रशिक्षण हे क्षेत्रिय स्तरावर शक्य तो जिल्हास्तरावर किंवा कार्यक्षेत्रावर घेण्यात यावे. म्हणजे स्थानिक इच्छूकांचा सहभाग होईल.

III. स्थापत्य विषयक प्रशिक्षणाची जबाबदारी संबंधीत सिंचन व्यवस्थापन मंडळाची राहील.

IV. यांत्रिकी व विद्युत विषयक प्रशिक्षणाची जबाबदारी संबंधीत यांत्रिकी मंडळाची राहील.

V. या अभ्यासक्रमाची परिक्षा महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी मार्फत घेतली जाईल.

VI. या प्रशिक्षणानंतर उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांना मेटा मार्फत प्रमाणपत्र दिले जाईल.

**५) या अभ्यासक्रमासाठी निवड झाल्याने अथवा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यामुळे संबंधित विद्यार्थ्यांना शासकीय / निमशासकीय/ स्थानिक स्वराज्य संस्था अथवा शासन अनुदानित संस्थांमध्ये कोणत्याही थेट नियुक्तीचा अधिकार राहणार नाही. तसेच याबाबत कोणतीही मागणी विचारात घेतली जाणार नाही.**

६) उपरोक्त शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०३१८०७१३८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2bf9216e9c82a387001366ade405f96dced8f883099a0df6ed a6dcc4a3cecb0, serialNumber=64cd9fc7921db221846e464a04d2971a520aa1ed7e728a 92a64c735ef2ea7cc9, cn=Vaijnath Manmathappa Chille
Date: 2021.12.06 12:39:09 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक,
२. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक,
३. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
४. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
५. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
६. महालेखापाल (१) (२) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
७. महालेखापाल (१) (२) (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
८. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक,
९. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ, जलसंपदा विभाग,
१०. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
११. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१२. अधीक्षक व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, (मेटा), नाशिक,
१३. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१४. आं.वि.स. व स.स., जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२,
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (सेवा-५ व ६ / व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-३२,
१६. निवड नस्ती/ लाक्षेवि (आस्था).